**प्रशासकीय मान्यता**

सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात श्री. साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी यांच्यामार्फत मंजूर अनुदानातून संस्थेकरिता यंत्र खरेदीस प्रशासकीय मान्यता.

इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर

**महाराष्ट्र शासन**

**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,**

**शासन निर्णय, क्रमांक : आयसीएन-२०१८/प्र.क्र.२१०/प्रशा-१**

गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन मंत्रालय,
९ वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई -४०० ००१,
दिनांक : १९ जून, २०१८.

**वाचा** :
१) शासन निर्णय,उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभाग, क्रमांक भांखस-२०१४/प्र.क्र. ८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७.
३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/आरोग्य-८, दिनांक ०७.०३.२०१८.
४) शासन निर्णय, विधी व न्याय विभाग, क्रमांक सासंवि-२०१८/५५७/ प्र.क्र.४५/का.१६, दिनांक १०.०४.२०१८
५) संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई यांचे पत्र क्र. संवैशिवसं/ इंगाशावैमवरुना/श्रीसाईबाबासंस्थान/यंसाख/१८-१९/५६५९/२०१८,दि. ०१.०६.२०१८.

**शासन निर्णय** :-

शासन निर्णय, संदर्भ क्रमांक ४, दिनांक १०.०४.२०१८ अन्वये सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर या संस्थेस श्री. साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी यांचेकडून यंत्रसामुग्री खरेदी करण्याकरीता रुपये ३५,२८,००,०००/- (अक्षरी रुपये पस्तीस कोटी अठ्ठावीस लक्ष फक्त) इतके अर्थसहाय्य उपलब्ध करुन देण्याकरिता मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. सदर अनुदानातून रुपये २५,००,००,०००/- (अक्षरी रुपये पंचवीस कोटी फक्त) इतक्या रकमेची खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे यंत्रसामुग्री खरेदी करण्यास या शासननिर्णयान्वये पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

| अ. क्र. | यंत्राचे नांव | नग | प्रत्येकी किंमत (रुपये) | एकूण किंमत (रुपये) | प्रशासकीय मान्यतेची रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १ | ३.० टेस्ला क्षमतेचे एम.आर.आय. मशीन टर्न की सहीत | ०१ | १२,००,००,००० | १२,००,००,००० | १२,००,००,००० |
| २ | १२८ स्लाईस सी.टी. स्कॅन टेस्ला विथ टर्न की | ०१ | ७,००,००,००० | ७,००,००,००० | ७,००,००,००० |
| ३ | डी.एस.ए.(डिजीटल सबट्रेक्शन ॲन्जीओग्राफी) विथ टर्न की | ०१ | ६,००,००,००० | ६,००,००,००० | ६,००,००,००० |
| | **एकूण** | | | **२५,००,००,०००** | **२५,००,००,०००** |

**अटी :-**

१. सदर प्रशासकीय मान्यता शासन निर्णय, विधी व न्याय विभाग, क्रमांक सासंवि-२०१८/ ५५७/प्र.क्र.४५/का.१६, दिनांक १०.०४.२०१८ अन्वये श्री. साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी यांच्याकडून अर्थसहाय्यित करण्यात आलेल्या अनुदानातून तसेच सदर शासन निर्णयात नमूद अटींच्या अधीन राहून प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर यंत्रसामुग्री खरेदीसाठी आवश्यक असलेल्या पदनिर्मीतीबाबतचा प्रसताव संबधित संस्थेने संचालनालयामार्फत शासनास सादर केलेला आहे, याची खातरजमा संबधित संस्थेने करावी.

३. सदर यंत्रसामुग्री खरेदी करण्यापूर्वी आवश्यक पदनिर्मिती प्रस्तावास मान्यता प्राप्त झालेली असेल तसेच सदर यंत्रसामुग्री प्रस्थापित करण्यासाठी आवश्यक असलेल्या स्थापत्यविषयक बांधकाम पूर्ण झालेले असेल, याबाबत संचालनालयाने व संबंधित अधिष्ठाता यांनी खातरजमा करावी.

४. सदर विषयी "शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका" याबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/ उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ मध्ये नमूद केलेल्या विहीत कार्यपध्दतीचे अनुपालन करण्यात यावे.

५. सदर यंत्रसामुग्री खरेदी विषयक प्रक्रिया "औषधे, तद्अनुषंगीक उपभोग्य वस्तू व वैद्यकीय उपकरणे या बाबींची खरेदी हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉपोरेशन लि. मार्फत करण्याबाबत" निर्गमित शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/ प्र.क्र.२४०/ आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७ नुसार करावी.

६. सदर यंत्रसामुग्रीची आवश्यकता असल्याचे व त्याची किंमत बाजारभावापेक्षा जास्त नसल्याची खात्री संचालक (वै.शि.) यांनी करावी.

७. सदर यंत्रसामुग्रीची विनिर्दिष्टे व्यापक, सर्वसमावेशक असून त्यानुसार यंत्रपुरवठा करु शकणारे किमान तीन उत्पादक/पुरवठादार यांचेकडून तीन निविदा प्राप्त होऊ शकतील अशा प्रकारची आहेत, असे संचालक (वै.शि.) यांनी प्रमाणित करावे.

८. प्रस्तावित यंत्रसामुग्रीचा समावेश इतरत्र कोणत्याही प्रस्तावात अंतर्भुत केलेला नसल्याबाबत व सदर यंत्रसामुग्री संबंधित संस्थेस आवश्यक असल्याबाबत संचालकांनी खात्री करावी.

९. मुख्य यंत्र व त्यांचे सुटे भाग (Accessories) यांच्या किंमती भिन्न दर्शविणे आवश्यक राहील.

१०. सदर विषयी यंत्रसामुग्री खरेदीबाबत निर्णय घेताना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या लेखाशिर्षाखाली मंजुर अनुदानाच्या तरतूदीपेक्षा जास्त खर्च केला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

११. उपरोक्त शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ मधील परिच्छेद क्रमांक ३.१.२ "किंमतीचा अंदाज व किंमतीचा वाजवीपणा" या शीर्षकाखालील परिच्छेद क्रमांक ३.१.२.१ मधील तरतूदीचे राज्यस्तरीय खरेदी समितीने अनुपालन करावे. सदर तरतूदीचे अनुपालन केलेल्या यंत्राच्या किंमतीस आवश्यकतेनुसार सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येईल.

**२.** या प्रयोजनासाठी उपरोक्त तक्यात नमूद केल्यानुसार येणारा यंत्रनिहाय खर्च सदर संस्थेस सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात श्री. साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी यांच्यामार्फत मंजूर असलेल्या रुपये ३५,२८,००,०००/- (अक्षरी रुपये पस्तीस कोटी अठ्ठावीस लक्ष फक्त) इतक्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**३.** शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग -२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६१९१६३४१५६११३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Arun M. Dahale

Digitally signed by Arun M. Dahale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Medical Education and Drugs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b335b52903c5914ab29c9ba5a50897b7b2244d66593f50dd713da83860912503, cn=Arun M. Dahale
Date: 2018.06.19 17:51:24 +05'30'

( अ. मु. डहाळे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. महालेखाकार - २ ( लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र, नागपूर.
२. प्रधान सचिव व विधी व परामर्शी, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. व्यवस्थापकीय संचालक, हाफकीन बायो फार्मास्युटीकल्स् कॉर्पोरेशन लि., मुंबई.
४. संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई.
५. अवर सचिव (वैसेवा-१), वैद्यकीय शिक्षण आणि औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अधिष्ठाता, इंदिरा गांधी शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, नागपूर.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
८. अध्यक्ष, श्री. साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी, जि. अहमदनगर.
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, श्री. साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी, जि. अहमदनगर.
१०.निवडनस्ती (प्रशा-१).